केंद्र शासन सहाय्यित प्रधानमंत्री सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजना (PMFME) सन २०२२-२३ मध्ये राबविण्यासाठी सर्वसाधारण प्रवर्गाकरिता केंद्र हिस्सा व राज्य हिस्सा मिळूण रुपये १६९०.८२६६७ लाख एवढा निधी वितरीत करण्यास मान्यता देणेबाबत..

## महाराष्ट्र शासन

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मस्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्र. प्रअयो-२०२२/प्र.क्र.१६९/९-अे**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- २५ मार्च, २०२३

**वाचा:-**

१) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२०/प्र.क्र.१२०/९-अे, दि. २३.१२.२०२०
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि. ०४.०४.२०२२ व दिनांक ०८.०२.२०२३
३) केंद्र शासनाचा दि. २०.०४.२०२२ रोजीचा ई-मेल.
४) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. प्रअयो-२०२२/प्र.क्र.१६९/९-अे, दि. २६.०७.२०२२
५) राज्य नोडल अधिकारी (PMFME) तथा संचालक (कृषि प्रक्रिया व नियोजन), कृषि आयुक्तालय, पुणे यांचे जा.क्र. पीएमएफएमई/सर्वसाधारण राज्यहिस्सा/९६१/२०२३, दिनांक १७.०१.२०२३ चे पत्र.
६) केंद्र शासनाचे पत्र F.No./FM-११/८७/२०२२-FME, Dated:०८.०२.२०२३
७) राज्य नोडल अधिकारी (PMFME) तथा संचालक (कृषि प्रक्रिया व नियोजन), कृषि आयुक्तालय, पुणे यांचे जा.क्र.पीएमएफएमई/राज्य हि./२२-२३/६०७७/२०२३, दिनांक १७.०२.२०२३ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासन पुरस्कृत प्रधानमंत्री सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजना (Prime Minister Scheme for Formalization of Micro Food Enterprises (PMFME) योजना राज्यात सन २०२०-२१ पासून पुढील पाच वर्षासाठी म्हणजे सन २०२४-२५ पर्यंत राबविण्यास वरील वाचा येथील दिनांक २३.१२.२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात आली आहे. सदर योजना सन २०२२-२३ मध्ये राज्यात राबविण्याकरिता वरील वाचा येथील दिनांक २६.०७.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये रुपये १७५.९० कोटी एवढया रकमेच्या आराखड्यास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.

केंद्र शासनाने वरील वाचा येथील दि.२०.०४.२०२२ रोजीच्या ई-मेल द्वारे योजनेंतर्गत वैयक्तिक लाभार्थी/ गट लाभार्थी प्रकल्प या घटकासाठी प्रथम राज्य हिस्याचे अर्थ सहाय्य नोडल बँकेस वितरीत करावे, तद्नंतर केंद्र शासनामार्फत केंद्र हिस्सा वितरीत केला जाईल असे कळविले आहे. केंद्र शासनाने आता उपरोक्त वाचा येथील दिनांक ०८.०२.२०२३ च्या पत्रान्वये खुल्या प्रवर्गाचा केंद्र हिस्सा रुपये ५००.४४ लाख एवढा निधी राज्य शासनाच्या एकत्रित निधीमध्ये जमा केला आहे. त्यास अनुसरुन

केंद्र हिस्सा व त्यास समरुप ४०% राज्य हिस्सा रुपये ३३३.६२६६७ लाख मिळून रुपये ८३४.०६६६७ लाख (रुपये आठ कोटी चौतीस लाख सहा हजार सहाशे सदुसष्ट फक्त) एवढा निधी वितरित करण्याची विनंती राज्य नोडल अधिकारी (PMFME), कृषि आयुक्तालय, पुणे यांनी केली आहे. त्याचप्रमाणे वाचा येथील दिनांक १०.०१.२०२३ च्या प्रस्तावातील रुपये ८५६.७६ लाख एवढा राज्य हिस्सा वितरित करणे शिल्लक होते. अशाप्रकारे केंद्र हिस्सा रुपये ५००.४४ लाख व राज्य हिस्सा (समरुप राज्य हिस्सा रुपये ३३३.६२६६७ लाख **+** वितरित करणे शिल्लक असलेला राज्य हिस्सा रुपये ८५६.७६ लाख = रुपये ११९०.३८६६७) असा केंद्र हिस्सा व राज्य हिस्सा मिळून एकूण रुपये १६९०.८२६६७ लाख (रुपये सोळा कोटी नव्वद लाख ब्याऐंशी हजार सहाशे सदुसष्ट फक्त) एवढा निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

केंद्र शासन पुरस्कृत प्रधानमंत्री सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजना (PMFME) सन २०२२-२३ मध्ये राज्यात राबविण्याकरिता सर्वसाधारण प्रवर्गासाठी केंद्र हिस्सा रुपये ५००.४४ लाख व समरुप राज्य हिस्सा रुपये ३३३.६२६६७ लाख + वितरित करणे शिल्लक असलेला राज्य हिस्सा रुपये ८५६.७६ लाख असा केंद्र हिस्सा व राज्य हिस्सा मिळून एकूण रुपये १६९०.८२६६७ लाख (रुपये सोळा कोटी नव्वद लाख ब्याऐंशी हजार सहाशे सदुसष्ट फक्त) एवढा निधी नोडल एजन्सी, प्रधानमंत्री सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजना (PMFME) तथा आयुक्त (कृषि) यांना वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरहू निधी खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

| | | |
|---|---|---|
| केंद्र हिस्सा | मागणी क्र.डी-३,<br>२४०१-पीक संवर्धन<br>१०२-अन्नधान्य पिके<br>(००) (३५) प्रधानमंत्री सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजना (सर्वसाधारण) (केंद्र हिस्सा ६० %)<br>३३- अर्थसहाय्य (२४०१ B३३९) | Demand No. D-3<br>2401-Crop Husbandry<br>102-Food Grain Crop<br>(00)(35) Pradhan Mantri Micro Food Processing Industry Scheme (General) (State Share 60 %)<br>33- Subsidies (2401 B339) |
| **राज्य हिस्सा** | मागणी क्र. डी-३<br>२४०१-पीक संवर्धन<br>१०२-अन्नधान्य पिके<br>(००)(३६) प्रधानमंत्री सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजना (सर्वसाधारण) (राज्य हिस्सा ४० %)<br>३३-अर्थसहाय्य (२४०१ बी३४८) | Demand No. D-3<br>2401-Crop Husbandry<br>102-Food Grain Crop<br>(00)(36) Pradhan Mantri Micro Food Processing Industry Scheme (General) (State Share 40 %)<br>33- Subsidies (2401 B348) |

३. सदर योजना सन २०२२-२३ मध्ये राबविण्याकरिता नोडल एजन्सी, प्रधानमंत्री सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजना (PMFME) तथा आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक

अधिकारी तर सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आंहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. या योजनेंतर्गत केंद्र शासनाने उपलब्ध करुन दिलेल्या निधीचा तात्काळ विनियोग करण्यात यावा तसेच निधी विनियोगाच्या अनुषंगाने नोडल एजन्सी, प्रधानमंत्री सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजना (PMFME) तथा आयुक्त (कृषी) यांनी वेळोवेळी उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र व राज्य शासनास सादर करावे.

५. उपरोक्त वाचा येथील दिनांक २३.१२.२०२० अन्वये निर्गमित केलेल्या शासन निर्णयातील विहित केलेल्या तरतुदींनुसार सदर योजनेची अंमलबजावणी करण्यात यावी

६. निधी खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका व वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेमध्ये उल्लेख केलेल्या तसेच नियोजन व वित्त विभागाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना, प्रचलित अटी व शर्ती तसेच वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

७. सदर शासन निर्णय वित्त विभाग, परिपत्रक क्रमांक:अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ०४.०४.२०२२ व दिनांक ०८.०२.२०२३ अन्वये विभागास प्रदान केलेले अधिकार तसेच नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक ११८/का-१४३१, दिनांक १६.०३.२०२३ व वित्त विभगाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक ७२/व्यय-१, दिनांक २१.०३.२०२३ अन्वये त्या विभागांनी दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०३२५११४०१३९४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

HEMANT GORAKHNATH MHAPANKAR

Digitally signed by HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=1775f5c28a439e88c4c15ab3f88d6a6beb26ad2675a8c7a7ff397b2e5305303d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6756123D309547BB1E152A6AEB6042BDE4040836DF541FD3620CA87FF8E71CC5, cn=HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
Date: 2023.03.25 11:45:54 +05'30'

**( हे. गो. म्हापणकर )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
३) मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
४) मा. विरोधी पक्षनेते, महाराष्ट्र विधानपरिषद/महाराष्ट्र विधानसभा, विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५) सर्व सन्माननीय विधानपरिषद/विधानसभा सदस्य, महाराष्ट्र राज्य.
६) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
७) अप्पर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
८) अप्पर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
९) अपर मुख्य सचिव (उद्योग), उद्योग, उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१०) अपर मुख्य सचिव, कौशल्य विकास उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

११) प्रधान सचिव (पदुम), कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१२) प्रधान सचिव (कृषि व फलोत्पादन), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१३) राज्य नोडल एजन्सी (पीएमएफएमई) तथा आयुक्त (कृषि), कृषी आयुक्तालय, पुणे.
१४) राज्य नोडल अधिकारी (पीएमएफएमई) तथा संचालक (कृषि प्रक्रिया व नियोजन), पुणे.
१५) सर्व विभागीय कृषि सह संचालक, महाराष्ट्र राज्य.
१६) सर्व जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी/तालुका कृषि अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
१७) सहायक संचालक (लेखा-१), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१८) महालेखापाल १/२, (लेखा व अनुज्ञेयता)/लेखा परीक्षा) मुंबई/नागपूर.
१९) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
२०) संचालक, लेखा व कोषागरे, मुंबई.
२१) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
२२) सह संचालक, लेखा व कोषागरे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई-३२.
२३) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
२४) माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई ३२.
२५) कक्ष अधिकारी (का.१४३१), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
२६) कक्ष अधिकारी (अर्थ.-१३/ व्यय-१), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
२७) कक्ष अधिकारी (२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
२८) निवड नस्ती-९अे.